**व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय व त्याच्या अधिपत्याखालील संस्था व कार्यालयातील सुधारीत आकृतीबंधानुसार अतिरिक्त ठरलेल्या “प्राचार्य/उपप्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था/ मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय/ सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट- ब (तांत्रिक) (राजपत्रित)” या संवर्गातील अधिकाऱ्यांची समायोजनाने पदस्थापना करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग**
**शासन आदेश क्रमांक : समायो-२०२२/प्र.क्र.१९३/१ /व्यशि-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०२ जून, २०२३

वाचा :- (१) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, शासन निर्णय क्रमांक:व्यशिअ-२०२०/प्र.क्र.१०२/व्यशि-१, दि. ०७/०४/२०२२
(२) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.०३/आस्था-०३/समायोजन/२०२२/१७४, दि. ०४/११/२०२२
(३) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.०३/आस्था-०३/समायोजन/२०२२/५६, दि. २५/११/२०२२

**शासन आदेश:-**

व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय व त्याच्या अधिपत्याखालील संस्था व कार्यालयातील पदांचा सुधारित आकृतीबंध या विभागाच्या संदर्भ क्र. (१) येथील शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आला आहे. सदर आकृतीबंधामध्ये काही संस्था व कार्यालयातील पदांची श्रेणी उन्नत करण्यात आली आहे तर काही कार्यरत पदे व्यपगत करण्यात आली आहेत. सदरची कार्यरत पदे व्यपगत करण्यात आली असल्याने तसेच काही कार्यालय व संस्थांतील पदांची श्रेणी उन्नत केल्यामुळे त्या पदावर कार्यरत अधिकाऱ्यांचे त्याच संगर्गातील रिक्त पदावर समायोजन करणे क्रमप्राप्त झाले आहे. त्याअनुषंगाने अतिरिक्त ठरलेल्या अधिकाऱ्यांकडून संचालनालयामार्फत विकल्प मागविण्यात आले होते. अधिकाऱ्यांकडून प्राप्त विकल्प व त्याअनुषंगाने समायोजनाबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. (२) व (३) येथील पत्रान्वये संचालनायालकडून प्राप्त झाला. संचालनालयाकडून प्राप्त समायोजनाचा प्रस्ताव व सदर अधिकाऱ्यांचे विकल्प विचारात घेऊन समायोजनाने पदस्थापनेचा प्रस्ताव मा. प्रधान सचिव, (कौ. रो. उ. व ना.) यांच्या अध्यक्षतेखालील नागरी सेवा मंडळाच्या दि. १६/०१/२०२३ रोजी आयोजित बैठकीत सादर करण्यात आला. नागरी सेवा मंडळाने केलेल्या शिफारशीस अनुसरुन समायोजनाने पदस्थापना देण्यासाठीच्या प्रस्तावास सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता घेण्यात आली आहे. त्यास अनुसरुन प्राचार्य/उपप्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था/ मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय/ सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, महाराष्ट्र शिक्षण सेवा, गट- ब (तांत्रिक) (राजपत्रित) या संवर्गामधील अतिरिक्त ठरलेल्या अधिकाऱ्यांचे त्याच संवर्गातील रिक्त पदांवर पुढीलप्रमाणे समायोजन करण्यात येत आहे:-

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | अतिरिक्त ठरलेली संस्था / कार्यालय | समायोजनाने करण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १ | श्री. नागनाथ नामदेव लवटे | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, बेलापूर, जि. रायगड | सहायक प्रशिक्षणार्थी सल्लागार, मुलभूत प्रशिक्षण तथा अनुषंगीक सूचना केंद्र द्वारा औद्योगिक प्रशिक्षण संस्था, ठाणे |

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | अतिरिक्त ठरलेली संस्था / कार्यालय | समायोजनाने करण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| २ | श्री. विकास विश्वास थोटे | मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय, शेवगाव, जि. अहमदनगर | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नेवासा, जि. अहमदनगर |
| ३ | श्री. प्रकाश सुमनलाल जैन | मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय, साक्री, जि. धुळे | उपप्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, नवापूर, जि. नंदूरबार |
| ४ | श्री. गोविंदसिंघ गणपतीसिंघ पाटनुरकर | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, कंधार, जि. नांदेड | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, औंढा नागनाथ, जि. हिंगोली |
| ५ | श्री. तुषार चित्रघ्न लोखंडे | मुख्याध्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा केंद्र, आर्वी, जि. वर्धा | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, आर्वी, जि. वर्धा |
| ६ | श्री. बी.जी. रासेकर | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था बल्लारपूर, जि. चंद्रपूर | मुख्याध्यापक, शासकीय तांत्रिक विद्यालय, वरोरा, जि. चंद्रपूर |
| ७ | श्री. मोहम्मद अजीज मोहम्मद सफी शाह | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, पारोळा, जि. जळगाव | प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, तळोदा, जि. नंदूरबार |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांना पदग्रहण अवधी, प्रवासभत्ता, दैनिक भत्ता व तद्नुंषगिक लाभ अनुज्ञेय राहतील.

३. संबंधित अधिकाऱ्यांची शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये, तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० सी नुसार मूळ कार्यालयाने समायोजनाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारु नयेत असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे समायोजनाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्याने रजेचा अर्ज पाठविल्यास सदर अर्जाची दखल घेण्यात येणार नसल्याच्या सूचना देण्यात याव्यात. पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे सेवापुस्तक व सेवाभिलेख बदलीच्या कार्यालयात विनाविलंब पाठविण्यात यावा.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक क्र. २०२३०६०२१७०७२९१३०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL DEVELOPMENT AND ENTREPRENEURSHIP DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=be7f8a656a063523ecdbac5e75130d8b7a4674a77a2691e4bf21582d392883e9, pseudonym=323361D01E3FB518718EE3AAAE55DB3EC668FBE8, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2023.06.02 17:10:23 +05'30'

**( प्रदीप सा. शिवतरे )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२) सह संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती नागपूर

३) सर्व संबंधित अधिकारी (संचालकांमार्फत)

४) सर्व संबंधित कार्यालय / संस्था (संचालकांमार्फत)

**प्रत,**

१. मा. मंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
६. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०. सह सचिव (व्यशि), कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंब
११. निवडनस्ती (व्यशि-१).